राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण (डायल-११२) प्रकल्पासाठीच्या चौदाव्या तिमाही हप्त्याच्या देयकांची रक्कम अदा करण्यासाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-**११/ई-७३९१२३/**पोल-३**

गृह विभाग, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २८.४.२०२५.

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२,दि.१७.०४.२०१५.

२) केंद्र शासनाचे पत्र क्र.१५०११/१९/२०१६-NERS (PM), दि.१६.०५.२०१७.

३) शासन निर्णय, गृह विभाग क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.६४/विशा-३(अ), दि.०४.०८.२०१७.

४) शासन निर्णय, गृह विभाग क्र. वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/पोल-३, दि.०४.०९.२०१७.

५) अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक १४.०८.२०१९ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

६) अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई व मे. महेंद्रा डिफेन्स सिस्टिम्स लि. यांच्यात दि.११.११.२०१९ रोजी झालेला करार.

७) शासन निर्णय, गृह विभाग क्र. वितंप्र-३६२०/प्र.क्र.२१/पोल-३,दि.०५.०३.२०२०, दि.२८.०८.२०२० व दि.१८.१२.२०२०.

८) शासन निर्णय,गृह विभाग क्र.वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-४/पोल-३,दि.२३.०६.२०२१ व दि.२४.११.२०२१.

९) शासन निर्णय, गृह विभाग क्र. वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-३/पोल-३, दि.०५.१०.२०२१, दि.१२.०१.२०२३, दि.२२.०२.२०२३ व दि.२७.०२.२०२३.

१०) शासन निर्णय, गृह विभाग क्र.वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-८/पोल-३,दि.२९.०३.२०२२ व दि.३१.०३.२०२२.

११) शासन निर्णय, गृह विभाग क्र.वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-९/पोल-३,दि.२२.०२.२०२३, व दि.२९.३.२०२३

१२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-१०/पोल-३,दि.३१.०३.२०२३, व दि.२८.७.२०२३

१३) शासन निर्णय, गृह विभाग क्र.वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-६/पोल-३,दि.४.९.२०२३

१४) शासन निर्णय, गृह विभाग क्र.वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-६/पोल-३,दि.३१.०३.२०२३, व दि.१.११.२०२३ आणि दि.२३.१.२०२४.

१५) शासन निर्णय, गृह विभाग क्र.वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-११/पोल-३,दि.५.३.२०२४, व दि.३०.३.२०२४ व दि.१०.१२.२०२४ व दि. २१.३.२०२५ व दि. ३१.३.२०२५

१६) मे. महेंद्रा डिफेन्स सिस्टिम्स लि.यांची दि.७.२.२०२५, दि.१०.२.२०२५ व दि.१०.३.२०२५ रोजीची देयके.

१७) अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१७/६१६२/डायल-११२ प्रकल्प/८१/२०१७,दि.२७.३.२०२५ व दि. ३.४.२०२५.

१८) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दि.१७.३.२०२५.

१९) शासन ज्ञापन,गृह विभाग क्र. संकीर्ण -३६२५/प्र.क्र.६२/पोल-३, दि. ३१.३.२०२५.

२०) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३,दि.७.४.२०२५.

**प्रस्तावना**

राज्यातील नागरिकांना आपत्कालीन परिस्थितीत पोलीस सेवा उपलब्ध करून देण्यासाठी राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण करण्याकरिता संदर्भाधीन शासन निर्णय क्र.४ नुसार प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१४.०८.२०१९ रोजीच्या बैठकीत रु.४०४,४४,६१,५१९/- (चारशे चार कोटी चव्वेचाळीस लाख एकसष्ठ हजार पाचशे एकोणीस फक्त) इतक्या प्रकल्प खर्चासह मे.महेंद्रा डिफेन्स सिस्टम्स लि. यांना Letter of Intent (LOI) निर्गमित करण्याबाबत निर्णय घेण्यात आला. त्याअनुषंगाने राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण (डायल-११२) प्रकल्पाकरिता अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई व मे. महेंद्रा डिफेन्स सिस्टम्स लि. याच्यांत करार करण्यात आला आहे. डायल-११२ प्रकल्पाकरिता आजतागायत **रु.२७८,८७,६४,२८९/-** इतकी रक्कम संदर्भ क्र.७ ते १५ येथील शासन निर्णयान्वये अदा करण्यात आली आहे.

डायल-११२ प्रकल्पाचे पुरवठादार मे. महेंद्रा डिफेन्स सिस्टम्स लि. यांनी खालीलप्रमाणे देयके सादर केली आहेत :-

(अ) मे.महेंद्रा डिफेन्स सिस्टम्स लि. यांनी प्रकल्पाच्या अनुषंगाने १४ व्या तिमाही (डिसें.२०२४ ते फेब्रुवारी.२०२५) बाबत काम पूर्ण केले असून खालीलप्रमाणे देयके सादर केली आहेत.

| Sr. No. | Billing Head | Invoice Amount | Penalty | Excess Amount Billed | Amount to be Paid (post deduction of SLA penalties) |
|---|---|---|---|---|---|
| A | B | C | D | E | F = C – (D+E) |
| 1 | Subtotal A : Quarter 14 - Opex 1 to Opex 8 payments | 6,69,02,436.98 | 1,03,612.34 | 0.00 | 6,67,98,824.64 |
| 2 | Subtotal B : Quarter 14 - Opex 9 (Dec 2024 - Feb 2025) payments | 3,41,00,343.99 | 0.00 | 0.00 | 3,41,00,343.99 |
| 3 | Subtotal C : Quarter 14 - Capex 1.5% quarterly payment Payments | 2,97,81,970 | 0.00 | 9.00 | 2,97,81,961 |
| | **Total** | **₹ 13,07,84,750.97** | **₹ 1,03,612.34** | **₹ 9.00** | **₹ 13,06,81,129.97** |
| | **Total Amount ==>** | | | | **₹ 13,06,81,130** |

वरीलप्रमाणे मे.महेंद्रा डिफेन्स सिस्टम्स लि. यांनी १४ व्या तिमाहीसाठी सादर केलेल्या उपरोक्त विवरणपत्राप्रमाणे एकूण रु.१३,०७,८४,७५०.९७ एवढ्या रकमेच्या देयकांमधून रु.१,०३,६१२.३४ (Penalty as per SLA) व देयकामध्ये अतिरिक्त आकारण्यात आलेली रुपये ९/- (नऊ फक्त) इतकी वजा करुन उर्वरीत रु.१३,०६,८१,१२९.९७ म्हणजेच एकूण रु. १३,०६,८१,१३०/- (जीएसटीसह) इतकी देय रक्कम अदा करण्याची विनंती अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त दि.२७.३.२०२५ च्या पत्रांन्वये केली आहे. सदरची देयके पोलीस महासंचालक कार्यालयातील डायल-११२ प्रकल्प सल्लागार समितीने तपासली असून दि.२६.३.२०२५ च्या पत्रांन्वये अभिप्राय सादर केले आहेत. तसेच सदर देयकांबाबत प्रकल्प सल्लागार अर्नेस्ट ॲण्ड यंग कंपनी यांनी अपर पोलीस महासंचालक (नि. व स.) यांना दि.१९.३.२०२५ च्या अग्रेषित केलेल्या पत्रान्वये अभिप्राय सादर केले आहेत.

राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण (डायल-११२) प्रकल्पाकरिता वरीलप्रमाणे एकूण **रुपये १३,०६,८१,१३०/- (रुपये तेरा कोटी सहा लाख एक्याऐंशी हजार एकशे तीस फक्त)** इतकी रक्कम वितरित करण्याचा शासन निर्णय दि.३१.३.२०२५ रोजी निर्गमित करण्यात आला. तथापि, पोलीस महासंचालक कार्यालयाकडून दि.३.४.२०२५ रोजीच्या पत्राद्वारे बील पोर्टल तांत्रिक अडचणींमुळे लॉग इन होत नसल्याने सदरची देयके दि.३१.३.२०२५ रोजी विहीत वेळेत कोषागारात सादर करणे शक्य झाले नाही व त्यामुळे हा निधी २०२४-२५ मध्ये खर्च झाला नाही. यास्तव सदर निधी सन २०२५-२६ या वित्तीय वर्षात मंजूर करण्याची केलेली विनंती विचारात घेता त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण (डायल-११२) प्रकल्पाच्या चौदाव्या तिमाहीच्या (Dec.२०२४ to Feb.२०२५) Opex-१ to Opex-९ व Capex १.५% Quarterly Payments करिता सादर केलेल्या रु.१३,०७,८४,७५०.९७ एवढ्या रकमेच्या देयकांमधून रु.१,०३,६१२.३४ (Penalty as per SLA) व देयकामध्ये अतिरिक्त आकारण्यात आलेली रुपये ९/- (नऊ फक्त) इतकी वजा करुन उर्वरीत रु.१३,०६,८१,१२९.९७ म्हणजेच एकूण **रु.१३,०६,८१,१३०/- (जीएसटीसह) ( अक्षरी रुपये तेरा कोटी सहा लाख एक्याऐंशी हजार एकशे तीस फक्त)** इतकी रक्कम वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. तसेच समक्रमांकाचा दि.३१.३.२०२५ रोजीचा शासन निर्णय याद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहे.

२. सदर रक्कमेची देयके अदा करताना प्रचलित कर वजाती करुन अदा करण्यात यावी.

३. प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त प्रमाणे होणारा खर्च “मागणी क्र.बी-१, २०५५- पोलीस (००) ११५, पोलीस दलाचे आधुनिकीकरण (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प (०१) (०१) तंत्रज्ञान विकास प्रकल्प (२०५५

ए०३२), ५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री," या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२५-२६ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदरहु निधी आहरित करण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषीत करण्यात येत आहे. तसेच त्यांनी उपरोक्त निधी आहरित करुन MAHINDRA DEFENCE SYSTEMS LTD या कंपनीच्या 209-214, Kailash Building 26, Kasturba Gandhi Marg, New Delhi-110001 येथील HDFC बँकेच्या शाखेचे खाते क्र.00030310014800 (IFSC Code - HDFC0000003) या खात्यावर जमा करावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग२, दि.१७.०४.२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग दि.७.४.२०२५ अनुसार तसेच वित्त विभागाने अनौ.सं.क्र.३२१/व्यय-७, दि.२१.४.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार सन २०२५-२६ या वित्तीय वर्षात निधी वितरणास दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२८१८३७३८७७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA TANAJI BHALWANE

Digitally signed by RAJENDRA TANAJI BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD514095659A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA TANAJI BHALWANE
Date: 2025.04.28 18:38:41 +05'30'

**(रा.ता.भालवणे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. अपर पोलीस महासंचालक, नि. व स., महाराष्ट्र राज्य, मुंबई.

९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. मे. महेंद्रा डिफेन्स सिस्टम्स लि., अंधेरी पुर्व.
१४. वित्त विभाग, व्यय-७/वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई.
१५. अर्थसं-१/गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. रोख शाखा/गृह विभाग, मंत्रालय, मुंबई. / निवडनस्ती, पोल-३.